आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग कार्यालयाच्या आस्थापनेवर तांत्रिक गट-ब या संवर्गातील दुग्धशाळा व्यवस्थापकाचे एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.: दुविप्र -१०२०/प्र.क्र.०३/२०२०/पदुम-६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ११ ऑगस्ट, २०२०.

<u>वाचा</u> :- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९
२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई यांचे क्र.आदुवि-२०(अ)/ २००८/ जावैप्र/सीआर २२/०८/भाग-३/२७, दि.३/१/२०२०

**<u>प्रस्तावना :-</u>**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र. ८९२८/ २०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर एफसीआर आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही असा निर्णय दिला आहे. तसेच मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ ,नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि.२८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दिनांक ३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात आले आहेत.

२. मा. न्यायालयाच्या आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१/१२/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अनुसूचित जमातीच्या अधिकारी /कर्मचाऱ्यांची संवर्गनिहाय संख्या निश्चित करुन त्यांच्या सेवा दिनांक ३१/१२/२०१९ पर्यंत अधिसंख्य पदावर वर्ग करावयाच्या आहेत. तसेच सदर पदे भरण्यासाठी विशेष भरती मोहिम राबविण्यासाठी कालमर्यादा देखील आखून देण्यात आली आहे.

३. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग कार्यालयाच्या आस्थापनेवरील श्री.डी.आर.लाखे यांची मुळ नियुक्ती अनुसूचीत जमातीच्या प्रवर्गाचे राखीव पदावर झालेली आहे. परंतू जात वैधता प्रमाणपत्र सादर करतांना त्यांनी भटक्या जमाती-क प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे त्यांची अनुसूचीत जमातीच्या प्रवर्गाच्या राखीव पदावर झालेली मुळ नियुक्ती ही अवैध ठरत आहे. त्यानुषंगाने त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याचा प्रस्ताव आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या संदर्भीय क्र.२ च्या पत्रान्वये सादर करण्यात आला आहे. त्यानुषंगाने पुढील निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :-**

आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील श्री. डी. आर. लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक यांची मुळ नियुक्ती अनुसूचीत जमातीच्या प्रवर्गाच्या राखीव पदावर झालेली आहे. परंतु जात वैधता प्रमाणपत्र सादर करताना त्यांनी भटक्या जमाती-क प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे त्यांची अनुसूचीत जमातीच्या प्रवर्गाच्या राखीव पदावर झालेली मुळ नियुक्ती ही अवैध ठरत आहे. यास्तव त्यांच्या सेवा दि.३१ डिसेंबर,२०१९ पासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या आस्थापनेवर, तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यां करीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत दुग्धशाळा व्यवस्थापक हे एक अधिसंख्य पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर एक अधिसंख्य पद निर्माण करुन त्या पदावर संबंधित अधिकाऱ्याची सेवा वर्ग करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००८१११५३६४५३००१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sudam Eknath Andhale

Digitally signed by Sudam Eknath Andhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257966df2620df1403d35023802519a4fbdcfcd894791eba41c2aef2b4c4b975, serialNumber=7b57fee59f0e7101b822a49c72629c21bf9b4dc0bde136817ee19b6b347e77f4, cn=Sudam Eknath Andhale
Date: 2020.08.11 15:42:30 +05'30'

**( सु. ए. आंधळे )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :**

१) प्रधान सचिव (पदूम), कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई.(५ प्रती)
३) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, औरंगाबाद/पुणे/कोकण/नागपूर/अमरावती विभाग.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर/नागपूर
७) श्री. डी. आर. लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक (आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास विभाग यांचे कार्यालयामार्फत)
८) मा.मंत्री (पदुम) यांचे स्वीय सहायक.
९) निवडनस्ती.